**एकात्मिक बाल विकास सेवा योजनेतंर्गत अंगणवाडी सेविका / मिनी अंगणवाडी सेविका / मदतनीस याची रिक्त पदे भरण्यास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१८/प्र.क्र.२२३/का.६**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १७ जानेवारी, २०२०

वाचा : - (१) महिला व बाल विकास विभाग,शा.नि.क्र. एबावि-२०१२/प्र.क्र.४२९/का.६, दिनांक १३ ऑगस्ट २०१४

(२) महिला व बाल विकास विभाग,शा.नि.क्र. एबावि-२०१६/प्र.क्र.२३०/का.६, दिनांक २२ सप्टेंबर २०१६

(३) महिला व बाल विकास विभाग,पत्र.क्र.एबावि-२०१६/प्र.क्र.१८०/का.६, दिनांक ७ सप्टेंबर २०१७

(४) महिला व बाल विकास विभाग,शा.नि.क्र. एबावि-२०१८/प्र.क्र.२०२/का.६, दिनांक ०८ ऑक्टोंबर, २०८

(५) मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या राज्य शक्ती प्रदान कार्यक्रम समितीची दिनांक २०/१२/२०१९ रोजी आयोजित बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत राज्यातील अंगणवाडयांची सुधारित संख्या निश्चित होईपर्यंत अंगणवाडी सेविका, मिनी अंगणवाडी सेविका व मदतनीस यांच्या रिक्त जागा भरण्यात येऊ नयेत. तसेच अल्प उपस्थितीच्या अंगणवाडयांची एकत्रिकरण करण्याच्या अनुषंगाने विभागाने कार्यवाही करावी, अशा वित्त विभागाने सूचना दिल्या होत्या. त्याअनुषंगाने याबाबत शासन पत्र दिनांक ७/०९/२०१७ अन्वये आदेश निर्गमित करण्यात आले होते. शासनाच्या सदर आदेशा विरुध्द महाराष्ट्र राज्य अंगणवाडी कर्मचारी संघ यांनी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे जनहित याचिका क्र.६७/२०१८ दाखल केली आहे.

२. एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत आदिवासी भागातील तसेच निती आयोगाच्या महत्वकांक्षी जिल्हयांमध्ये अंगणवाडी केंद्रातील अंगणवाडी सेविका, मिनी अंगणवाडी सेविका व मदतनीस यांची रिक्त पदे भरण्याबाबत महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय दिनांक ५ जुलै, २०१३ अन्वये मा. मुख्य सचिव, यांचे अध्यक्षतेखाली गठित केलेल्या राज्य शक्ती प्रदान कार्यक्रम समितीने दि.२५/७/२०१८ रोजी झालेल्या बैठकीमध्ये नंदुरबार, गडचिरोली, उस्मानाबाद, वाशिम तसेच डावी-कडवी विचारसरणी यामधील गोंदिया, चंद्रपूर व भंडारा जिल्हयातील काही भाग (डावी कडवी विचारसरणी अंतर्गत येणाऱ्या जिल्हयांची अद्यावत यादीनुसार) तसेच संपूर्ण पालघर जिल्हा, अमरावती जिल्हयातील मेळघाट, धारणी आणि चिखलदरा या प्रकल्प / तालुक्यातील अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका यांची रिक्त पदे भरण्यास सदर बैठकीत मान्यता देण्यात आली होती. त्यानुसार सदर पदे दिनांक १ नोव्हेंबर, २०१८ पासून भरण्याबाबत संदर्भाधिन क्र.४ येथील शासन निर्णय दिनांक ८/१०/२०१८ अन्वये शासन मंजूरी देण्यात आली आहे. .

३. तद्नंतर अंगणवाडी केंद्रांचे एकत्रिकरण बाबतचे सर्वेक्षण करुन एकात्मिक बाल विकास सेवा योजनेची प्रभावी अंमलबजावणी होण्याच्या अनुषंगाने दिनांक ८/१०/२०१८ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिलेल्या क्षेत्रा व्यतिरिक्त उर्वरित सर्व अंगणवाडी कर्मचाऱ्यांची रिक्त पदे भरणे व केंद्र शासनाने मंजूरी दिलेल्या परंतु कार्यान्वित न झालेल्या अंगणवाडी / मिनी अंगणवाडी येथील पदभरती मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या राज्य शक्ती प्रदान कार्यक्रम समितीच्या दिनांक २०/१२/२०१९ रोजी झालेल्या बैठकीमध्ये प्रस्ताव सादर करण्यात आला होता. त्याअनुषंगाने सदर बैठकीत झालेलया निर्णयानुसार दिनांक ८/१०/२०१८ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिलेल्या क्षेत्रा व्यतिरिक्त उर्वरित सर्व क्षेत्रामधील अंगणवाडयांमधील रिक्त पदे भरण्यास परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संदर्भाधिन दिनांक ८/१०/२०१८ च्या शासन निर्णयान्वये निती आयोगाचे महत्वकांक्षी जिल्हे नंदुरबार, गडचिरोली, उस्मानाबाद, वाशिम तसेच डावी कडवी विचारसरणी यांमधील गोंदिया, चंद्रपूर व भंडारा जिल्ह्यातील काही भाग (डावी कडवी विचारसरणी अंतर्गत येणाऱ्या जिल्ह्यांची अद्यावत यादीनुसार) तसेच पालघर संपूर्ण जिल्हा, अमरावती जिल्ह्यातील मेळघाट, धारणी आणि चिखलदरा या प्रकल्प / तालुक्यातील अंगणवाडी सेविका / मदतनीस / मिनी अंगणवाडी सेविका यांची रिक्त पदे दिनांक १ नोव्हेंबर २०१८ पासून भरण्यास शासन मंजूरी देण्यात आली आहे. एकात्मिक बाल विकास सेवा योजनेची प्रभावी अंमलबजावणी होण्याच्या अनुषंगाने दिनांक ८/१०/२०१८ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिलेल्या क्षेत्रा व्यतिरिक्त उर्वरित सर्व क्षेत्रातील रिक्त पदांपैकी ५०% रिक्त पदे भरण्यास खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१. सदरहू ५०% रिक्त पदांची भरती करतांना CAS (Common application software) मध्ये जास्तीत जास्त मुलांची उपस्थिती असणारी अंगणवाडी केंद्र, आदिवासी क्षेत्रातील, कुपोषणाची तीव्र समस्या असलेले क्षेत्र, डोंगराळ भाग व तालुक्याच्या ठिकाणापासून दुर्गम भागात असलेली अंगणवाडी केंद्र यामधील रिक्त पदांची भरती प्राधान्याने करण्यात यावी.
२. वरील निकषानुसार पद भरती करीता पात्र ठरणाऱ्या अंगणवाडी केंद्रांची निश्चिती करण्याची कार्यवाही आयुक्त, एकात्मिक बाल विका सेवा योजना, नवी मुंबई यांनी करावी. तद्नंतर अशा केंद्रांमध्ये पद भरती करण्याबाबतच्या सविस्तर सूचना संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांना आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी देण्यात याव्यात.
३. अंगणवाडी सेविका / मदतनीस / मिनी अंगणवाडी सेविकांची रिक्त पदे भरताना शासनाच्या दिनांक १३ ऑगस्ट २०१४ च्या शासन निर्णयातील व दिनांक २२ सप्टेंबर २०१६ च्या शासन निर्णयातील कार्यपध्दतीचे तंतोतंत पालन करण्यात यावे. अंगणवाडी सेविका / मदतनीस / मिनी अंगणवाडी सेविका यांच्या मानधनी सेवा भरती प्रक्रियेत शासनाने वेळोवेळी केलेल्या सुधारणा नव्याने भरती केलेल्या सर्व सेविकांना लागु रहातील.
४. उपरोक्त सूचनांची तंतोतंत अंमलबजावणी होत असल्याची खातरजमा आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी घ्यावी.

२. उर्वरित ५०% रिक्त पदे भरण्याबाबतचा निर्णय होण्याच्या अनुषंगाने आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी अंगणवाडी एकत्रिकरणाबाबत नव्याने सर्वेक्षण करुन त्याबाबतचा

प्रस्ताव १ महिन्यामध्ये मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली गठित केलेल्या राज्य शक्ती प्रदान कार्यक्रम समितीसमोर (State Empowered Programme Committee) सादर करण्याबाबतची दक्षता घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००११७१०५८२३६५३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Lalsing
Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, serialNumber=4ca059ab7b8d64aaf749fe58e0a714a015f521cb28fd2204e49a4d81f12a5745, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2020.01.20 12:27:28 +05'30'

**(ला.रा.गुजर)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री, महिला व बाल विकास, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री, महिला व बाल विकास, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
४. अपर मुख्य सचिव ( नियोजन),नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई
५. अपर मुख्य सचिव ( वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव (वित्तीय सुधारणा), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव (आदिवासी विकास) आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
९. प्रधान सचिव-२, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
११. सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई
१४. आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
१५. महासंचालक, माहिती व प्रसिध्दी, मंत्रालय, मुंबई
१६. सर्व विभागीय आयुक्त
१७. सर्व जिल्हाधिकारी
१८. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१९. सर्व महानगरपालिका आयुक्त, महानगरपालिका
२०. सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास विभाग
२१. सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी (महिला व बाल विकास) जिल्हा परिषद
२२. सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी/ग्रामीण/आदिवासी )
२३. सर्व मुख्याधिकारी, नगरपालिका,
२४. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई / नागपूर
२५. महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन,मुंबई
२६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई
२८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२९. निवड नस्ती/कार्यासन-६